**अल्पसंख्यांकाच्या कल्याणाकरिता मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हा स्तरीय समितीची पुनर्रचना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक: अविवि-२०१५/प्र.क्र.२४०/कार्या-९,**
मंत्रालय, मुंबई-०० ०३२,
दिनांक: १५ एप्रिल, २०१७.

<u>वाचा</u>:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. आरएमएन-२००८/प्र.क्र.३३/२००८/३५, दि: २६ मार्च, २००८.
२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१०/प्र.क्र.३/१०/का-९, दि: २९ एप्रिल, २०११.
३) क्र: समिती-२०१५/प्र.क्र.१४/का-९, दि. ३० जानेवारी, २०१५ रोजी सर्व जिल्हाधिकारी यांना लिहिलेले पत्र,
४) संयुक्त सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे दि. २१ सप्टेंबर, २०१५ रोजीचे अ.शा.पत्र.
५) संचालक, अल्पसंख्यांक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र. ९/४५/२०१४-पीपी-II, दि. ३० नोव्हेंबर, २०१५ रोजीचे पत्र.

<u>प्रस्तावना :-</u>

यापूर्वी वेळोवेळी अल्पसंख्यांक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अल्पसंख्याकांच्या कल्याणाकरिता मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यातील जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली दि. ६ ऑक्टोबर, २००६ च्या शासन निर्णयान्वये स्थापन करण्यात आलेल्या ९ शासकीय सदस्यांच्या तत्कालीन जिल्हास्तरीय संनियंत्रण समितीची दि. २६ मार्च, २००८ व दि. ५ जून, २०१० च्या शासन निर्णयांन्वये पुनर्रचना करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये जिल्हा अल्पसंख्याक समितीचे गठन करण्याबाबत राज्यभरातील सर्व जिल्हाधिकाऱ्यांना कळविण्यात आले होते. संदर्भ क्र.४ येथील अर्धशासकीय पत्रातील मार्गदर्शक सूचना व संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये राज्य शासनास मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हास्तरीय समितीची पुनर्रचना करण्याबाबत सूचित केले आहे. तसेच जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीमध्ये समाविष्ट करावयाच्या राज्यसभा सदस्यांची नामनिर्देशन सूची केंद्र शासनाने पाठविलेली आहे.

२. राज्यातील अल्पसंख्यांक समाजाच्या सामाजिक,आर्थिक व शैक्षणिक उन्नतीसाठी तसेच स्थानिक अल्पसंख्याकांच्या समस्या तातडीने सोडविण्यासाठी प्रत्येक जिल्ह्यात जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली जिल्हास्तरीय संनियंत्रण समित्या स्थापन करण्यात आल्या होत्या.

३. अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या सुधारीत मार्गदर्शक सूचनांनुसार मा. पंतप्रधान यांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी

संदर्भ क्र.२ येथील दिनांक २९ एप्रिल, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये गठीत केलेल्या जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समित्या बरखास्त करण्याचा तसेच नव्याने जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समित्या गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्यांकाच्या कल्याणाकरिता मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भ क्र. २ येथील दिनांक २९ एप्रिल, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये गठीत करण्यात आलेल्या "जिल्हा अल्पसंख्याक कल्याण समिती" च्या रचनेमध्ये अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या संदर्भ क्र. ४ येथील अ.शा.पत्र व संदर्भ क्र. ५ येथील पत्रान्वये दिलेल्या सूचनांनुसार यापूर्वीची "जिल्हास्तरीय विकास संनियंत्रण समिती" बरखास्त करण्यात येत असून त्याऐवजी खालीलप्रमाणे "जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समिती" स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

अ) संबधित जिल्हाधिकारी/उपायुक्त - अध्यक्ष
आ) जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधित इतर अधिकारी - सदस्य
इ) स्थानिक पंचायत राज संस्थांचे प्रतिनिधी ( संख्या निश्चित नाही तथापि प्रामुख्याने ग्रामीण तसेच नागरी क्षेत्रातील अल्पसंख्याक कल्याणाशी संबंधित) - सदस्य
ई) जिल्हयातील अल्पसंख्याकासाठी काम करण्याऱ्या ३ नामवंत अशासकीय स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी - सदस्य
उ) जिल्हयातील सर्व लोकसभा सदस्य - सदस्य
ए) जिल्हयातील सर्व विधानसभा सदस्य - सदस्य
ऐ) राज्यातील प्रत्येक जिल्ह्याकरिता केंद्र शासनाने नामनिर्देशित केलेले एक राज्यसभा सदस्य - सदस्य

| अ.क्र. | जिल्ह्याचे नांव | नामनिर्देशित राज्यसभा सदस्याचे नांव |
|---|---|---|
| १ | हिंगोली | श्री. हुसेन दलवाई |
| २ | वाशिम | श्री. मजिद मेमन |
| ३ | बुलडाणा | श्री. राजीव शुक्ला |
| ४ | परभणी | श्री. अजय संचेती |
| ५ | अहमदनगर | श्री. अमर शंकर साबळे |
| ६ | अकोला | श्री. हुसेन दलवाई |
| ७ | अमरावती | श्री. संजय राऊत |
| ८ | औरंगाबाद | श्री. राजकुमार धूत |
| ९ | बीड | श्रीमती रजनी पाटील |
| १० | भंडारा | -- |
| ११ | चंद्रपूर | -- |
| १२ | धुळे | श्री. संजय दत्तात्रय काकडे |
| १३ | गडचिरोली | -- |

| | | |
|---|---|---|
| १४ | गोंदिया | श्री. प्रफुल्ल पटेल |
| १५ | जळगांव | -- |
| १६ | जालना | श्री. राजकुमार धूत |
| १७ | कोल्हापूर | -- |
| १८ | लातूर | श्री. मजिद मेमन |
| १९ | मुंबई | श्री. मजिद मेमन |
| २० | मुंबई उपनगर | श्री. राजीव शुक्ला |
| २१ | नागपूर | श्री. अजय संचेती |
| २२ | नांदेड | -- |
| २३ | नंदूरबार | श्री. हुसेन दलवाई |
| २४ | नाशिक | श्री. अनिल देसाई |
| २५ | उस्मानाबाद | श्री. हुसेन दलवाई |
| २६ | पुणे | श्रीमती वंदना चव्हाण |
| २७ | रायगड | श्री. मजीद मेमन |
| २८ | रत्नागिरी | श्री. हुसेन दलवाई |
| २९ | सांगली | श्री. रामदास आठवले |
| ३० | सातारा | श्री.डी.पी.त्रिपाठी |
| ३१ | सोलापूर | श्री.शरद पवार |
| ३२ | सिंधुदुर्ग | श्री.राजीव शुक्ला |
| ३३ | ठाणे | श्री.अजय संचेती |
| ३४ | वर्धा | श्री.अमर शंकर साबळे |
| ३५ | यवतमाळ | श्री.मजिद मेमन |

* पदाची मुदत संपुष्टात आल्यामुळे किंवा अन्य कोणत्याही कारणामुळे संसद सदस्य / विधानसभा सदस्यांचे पद रिक्त झाल्यास जिल्हाधिकारी यांनी त्याबाबतचा अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

२. वरीलप्रमाणे समितीच्या संरचनेतील (इ) येथील तरतूदीनुसार "स्थानिक पंचायतराज संस्थांचे प्रतिनिधी" म्हणून योग्य प्रतिनिधींच्या नावांची शिफारस जिल्हाधिकारी यांनी शासनास करावी.

तसेच, संरचनेतील (ई) येथील तरतूदीनुसार जिल्हाधिकारी यांनी जिल्ह्यातील अल्पसंख्यांकांसाठी काम करणाऱ्या ३ नामवंत संस्थांचे प्रतिनिधी यांची नियुक्ती करण्यासाठी त्यांच्या स्तरावर अर्ज/ प्रस्ताव मागवावेत. प्राप्त अर्ज/ प्रस्ताव यांची छाननी करुन योग्य व पात्र असणाऱ्या ३ मान्यवर संस्थेंच्या प्रत्येकी १ प्रमाणे एकूण ३ सदस्यांच्या नियुक्तीसाठी शासनास शिफारसी सादर कराव्यात.

सदर दोन्ही संवर्गातील/ गटातील नियुक्त्यांसाठी जिल्हाधिकारी यांच्याकडून प्राप्त शिफारसी तसेच शासनस्तरावर प्राप्त झालेल्या अन्य शिफारसी विचारात घेवून सदर दोन्ही संवर्गातील/ गटातील सदस्यांच्या नियुक्त्या शासन स्तरावरून करण्यात येतील.

तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांनी आपल्या जिल्ह्यातील सर्व लोकसभा सदस्य, जिल्ह्यासाठी नामनिर्देशित राज्यसभा सदस्य, जिल्ह्यातील सर्व विधानसभा सदस्य, जिल्ह्यातील विविध विभागाचे अधिकारी, इ. यांची बैठक आयोजित करुन जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीचे गठन करावे.

३. जिल्हास्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीची कार्ये खालीलप्रमाणे असतील:-

१) मा. पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमाच्या जिल्हा स्तरावरील कार्यक्रमाचा आढावा.

२) स्थानिक अल्पसंख्यांक समाजाच्या शैक्षणिक समस्यांचा अभ्यास करुन राज्य अल्पसंख्यांक आयोगास योग्य त्या शिफारशी पाठविणे,

३) अल्पसंख्यांक समुदायामध्ये विशेषत: स्त्रियांमध्ये शिक्षणाचा प्रसार करणे,

४) स्थानिक अल्पसंख्यांक शैक्षणिक संस्थांचा दर्जा सुधारण्याकरिता योग्य त्या उपाययोजना सुचविणे.

५) अल्पसंख्यांकांची गाऱ्हाणी ऐकून त्यावर वेळोवेळी उपाययोजना सुचविणे.

६) जिल्ह्यातील अल्पसंख्यांकाचे सामाजिक,शैक्षणिक वा आर्थिक सर्वेक्षण करुन माहिती पाठविणे.

७) जिल्ह्यात शांतता व जातीय सलोखा कायम ठेवण्यास प्रशासनास मदत करणे.

८) दंगलपिडीतांचे पुनर्वसन,आर्थिक मदत व बँकेकडून कर्ज मिळवून देण्यास सहाय्य करणे.

९) राज्य शासन व केंद्र शासनामार्फत अल्पसंख्यांकाच्या कल्याणासाठी राबविण्यात येणाऱ्या योजनांचा अल्पसंख्यांक समुदायामध्ये प्रसार करणे.

१०)राज्य शासन व केंद्र शासनाकडून अल्पसंख्यांक कल्याणाकरिता राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे.

११)अल्पसंख्यांक कार्य मंत्रालय, भारत सरकार, राष्ट्रीय अल्पसंख्यांक आयोग व राज्य अल्पसंख्याक आयोग येथील अधिकारी/ पदाधिकारी यांच्या जिल्हा दौऱ्याप्रसंगी संबंधितांशी सहकार्य व समन्वयाने काम करणे.

४. जिल्हा अल्पसंख्यांक विकास संनियंत्रण समितीची कार्ये सदर समितीमध्ये समाविष्ट केल्याने शासन निर्णय, अल्पसंख्यांक विकास विभाग, क्र. अविवि-२०१०/प्र.क्र.३/१०/का-९, दिनांक २९ एप्रिल, २०११ अन्वये व संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये गठीत केलेल्या जिल्हा अल्पसंख्याक समित्या या आदेशाद्वारे बरखास्त करण्यात येत आहेत.

५. जिल्हास्तरीय अल्पसंख्यांक कल्याण समितीची बैठक जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली दर तिमाही आयोजित करण्यात येईल. जिल्हाधिकारी यांनी समितीच्या बैठकीचा अहवाल बैठक झाल्यानंतर पुढील महिन्याच्या १५ तारखेपूर्वी शासनास सादर करावा.

६. जिल्हा स्तरीय अल्पसंख्याक कल्याण समितीवर अल्पसंख्यांकासाठी काम करणाऱ्या ३ संस्थांच्या प्रतिनिधींना कोणतेही मानधन व बैठक भत्ता देय होणार नाही.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१६५१५४४४१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MINORITY DEVELOPMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bcd09896471a6f90b80581ca42d45e27f07ad7e99a45bec3a7579cf10330fcd, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2017.04.18 16:54:18 +05'30'

**( अशोक गायकवाड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु. सचिव,मंत्रालय,मुंबई,
३) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
४) सर्व संबंधित मा. लोकसभा/ राज्यसभा सदस्य
५) सर्व संबंधित विधानसभा सदस्य
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे सह सचिव,
७) सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव /सचिव,मंत्रालय, मुंबई,
८) संचालक, अल्पसंख्यांक कार्य मंत्रालय, भारत सरकार,११ वा मजला,पर्यावरण भवन,सी.जी.ओ. कॉम्प्लेक्स, लोधी रोड, नवी दिल्ली-११०००३,
९) सर्व विभागीय आयुक्त,
१०) सर्व जिल्हाधिकारी,
११) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१२)सर्व पोलीस आयुक्त/जिल्हा पोलीस अधिक्षक,
१३)सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग, मुंबई,
१४) व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद आर्थिक विकास महामंडळ मर्यादीत, मुंबई,
१५) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद,
१६) कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई,
१७) अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई,
१८) सर्व शिक्षण अधिकारी, जिल्हापरिषद,
१९) सर्व शिक्षण अधिकारी, महानगरपालिका,
२०) सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
२१) सर्व जिल्हा महिला व बालकल्याण अधिकारी,
२२)सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार अधिकारी,
२३) सर्व महानगरपालिका आयुक्त,
२४) सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी (न.पा.प्रशासन),जिल्हाधिकारी कार्यालय,
२५) सर्व निवासी उप जिल्हाधिकारी,
२६) सर्व सह सचिव/ उप सचिव/ अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२७) निवडनस्ती